**नगर विकास विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांतर्गत मंजूर पाणीपुरवठा प्रकल्पांच्या अंमलबजावणीची सुधारीत कार्यपद्धती.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२८/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई
तारीख: १४ फेब्रुवारी, २०१७

वाचा -

**१) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक - ग्रापाधो ११०९/प्र.क्र.१०४(अ)/ पापु-०७, दिनांक १७ मार्च, २०१०**
**२) शासन परिपत्रक नगर विकास विभाग क्रमांकः संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२८/नवि-३३ दिनांक १७ फेब्रुवारी, २०१६**
**३) शासन शुद्धीपत्रक नगर विकास विभाग क्रमांकः संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२८/नवि-३३ दिनांक ०९ मार्च, २०१६**

प्रस्तावना -

केंद्र व राज्य पुरस्कृत विविध योजनांद्वारे विविध नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमार्फत पाणीपुरवठा प्रकल्प राबविण्यात येत असतात. राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमार्फत राबविलेल्या प्रकलपांच्या आढाव्यात प्रकल्प कार्यान्वित करताना त्यांच्या उपांगांचा चक्रानुक्रम विहित पध्दतीने पाळला जात नसल्याचे दिसून आले. त्यामुळे प्रकल्पासाठी सुरूवातीस फक्त पाईपची खरेदी करणे किंवा प्रकल्प पूर्ण होत आला तरी पाण्याच्या टाक्या किंवा जुलशुद्धीकरण केंद्राचे काम सूरू देखिल झालेले नसणे अशा स्वरुपाच्या बाबी निदर्शनास आल्या होत्या. सबब नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचे प्रकल्प पूर्ण होण्यास विलंब होणे, नागरीकांना सदर सुविधांपासून वंचित रहावे लागणे या समस्यांना तोंड दयावे लागत होते. ही बाब विचारात घेता पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत निर्गमित केलेल्या ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र १ च्या मार्गदर्शक सूचनांच्या धर्तीवर **नागरी पाणीपुरवठा विषयक प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी कार्यपद्धती** समक्रमांकाच्या दिनांक १७ फेब्रुवारी, २०१६ व दिनांक ०९ मार्च, २०१६ च्या परिपत्रकान्वये विहित करण्यात आली होती. मात्र, त्यातील तरतूदींमुळे कामाच्या बारचार्टप्रमाणे कामे पूर्ण केली जात नसल्याचे निदर्शनास आल्यामुळे सदर परिपत्रक अधिक्रमित करून **सुधारित परिपत्रक** निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन परिपत्रक-

**समक्रमांकाचे दिनांक १७ फेब्रुवारी, २०१६ व दिनांक ०९ मार्च, २०१६ ची परिपत्रके याद्वारे अधिक्रमित करण्यात येत असून राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमार्फत पाणी पुरवठा विषयक प्रकल्प राबविताना पाणी पुरवठा प्रकल्पाच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी पुढीलप्रमाणे सुधारीत मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत.**

### १. धोरणातील तत्व व प्राधान्य क्रम

नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या किफायतशीर व शाश्वत उपाययोजना घेता याव्यात व त्या संबंधित लाभार्थ्यांना परवडाव्यात, या उद्देशाने नागरी भागात नव्याने घ्यावयाच्या पिण्याच्या पाण्याच्या उपाययोजनांविषयी निर्णय घेताना खालील तत्वे व प्राधान्य क्रमाचा विचार व्हावा.

१) शहरात अस्तित्वात असलेल्या सर्व पिण्याच्या पाण्याच्या उपाययोजनांचा (existing drinking water infrastructure) आढावा घेऊन त्यातील स्त्रोतांचे संवर्धन व बळकटीकरण करणे, अस्तित्वात असलेल्या योजनांमध्ये सुधारणा करणे.

२) गुणवत्ताबाधित शहरांकरिता सुरक्षित स्त्रोत विकसित करण्याकरीता उपाययोजना घेणे.

३) शहराच्या लोकसंख्येत झालेल्या वाढीमुळे पूरक योजनांचा विचार करणे.

४) उपाययोजना प्रस्तावित करताना, वेगवेगळया विकल्पापैकी, किमान खर्चावर आधारीत विकल्पाचा विचार करणे.

५) संपूर्ण शहरासाठी एकच योजना करण्यापेक्षा विकेंद्रीत उपाययोजना किफायतशीर असल्यास त्याला प्राधान्य देणे. योजना आखताना भूजल व भूपृष्ठावरील सार्वजनिक व खाजगी अशा सर्व स्त्रोतांचा अभ्यास करून नियोजन करणे.

६) प्रस्तावित पाणीपुरवठा योजनांमध्ये स्त्रोत बळकटीकरण व १००% घरगुती नळ जोडण्याचा समावेश अनिवार्य करणे.

७) पाण्याची गुणवत्ता टिकविण्याकरीता शहरात संपूर्ण स्वच्छता आवश्यक असून शहर हागणदारी मुक्त होणे ही अट नवीन योजनांचे काम सुरू करण्याकरीता अनिर्वाय करणे.

### २.भुसंपादन, आवश्यक परवाने व स्वहिस्सा

१) पाणी पुरवठा विषयक प्रकल्प राबविण्याची पूर्वतयारी करताना प्रकल्पासाठी (पंपगृह/साठवण टाकी/ जलशुध्दीकरण केंद्र इ.) जागा स्थानिक स्वराज संस्थांच्या ताब्यात नसल्यास अशी जागा संपादन करण्याची कार्यवाही प्रथम करण्यात यावी. सदर प्रकल्पासाठी महसूल व वन विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, रेल्वे इत्यादी विभागाची परवानगी आवश्यक असल्यास सदर परवानगी प्राप्त करून घेणेबाबत कार्यवाही प्रकल्पाचे नियोजन करतानाच पूर्ण करण्यात यावी.

२) पाणी पुरवठा प्रकल्पाचे नियोजन करताना योजनेच्या वित्तीय आकृतीबंधानुसार प्रकल्पासाठी संबंधित योजनेच्या सूत्रानुसार नागरी स्थानिक स्वराज संस्थेच्या आवश्यक स्वहिश्याचा निधी उभारणेबाबत योग्य ते नियोजन करण्यात यावे.

**३. तांत्रिक व प्रशासकिय मान्यता**

नगर विकास विभागाच्या ज्या योजनेनुसार पाणी पुरवठा प्रकल्प राबविण्यात येते आहे. त्या योजनेच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे प्रकल्पास आधी तांत्रिक व प्रशासकिय मान्यता घेण्यात यावी. सद्यस्थितीत सर्व ड वर्ग महानगरपालिका, सर्व नगरपरिषदा व नगरपंचायती यांनी त्यांच्या पाणी पुरवठा प्रकल्पासाठी तांत्रिक मान्यता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून घेणे अनिवार्य आहे.

**४. अंमलबजावणी टप्पा (Execution Phase)**

**४.१ निविदा प्रक्रिया**

अ. पाणी पुरवठा प्रकल्पास शासनाची प्रशासकिय मान्यता मिळाल्यानंतर योजनेच्या सर्व उपांगाबाबत एकत्रित निविदा प्रक्रिया पूर्ण करण्यात यावी.

ब. निविदेमध्येच प्रकल्पाचे कामे पूर्ण करण्यासाठी कालमर्यादा ठरवून विहित करण्यात यावी. त्यानुसार विहीत कालावधीत पूर्ण करण्यात यावीत. कामे पूर्ण करण्यास विलंब केल्यास, संबंधितांवर दंडात्मक कारवाई करण्याबाबतचे कलम निविदेत ठेवण्यात यावे.

क. रूपये ५ कोटी किंमतीवरील योजनेकरीता ठेकेदार निवडतांना या ठेकेदारांची निविदा पूर्व अर्हता (pre-qualification) निश्चित करावी. अशा अर्हतेचा निविदा सूचनेमध्ये स्पष्ट उल्लेख असावा. अशी पुर्व अर्हता ठरविताना निकोप स्पर्धेस बाधा येणार नाही याची दक्षता घ्यावी.

**४.२ स्त्रोतांचा विकास**

अ. सर्वप्रथम योजनेच्या स्त्रोतांची (भूपृष्ठ अथवा भूजलाधारीत स्त्रोतांची) कामे हाती घ्यावीत. भूजलाधारीत स्त्रोतांचे काम पूर्ण झाल्यानंतर पावसाळयापूर्वी त्याची चाचणी करावी.

ब. स्त्रोतांच्या कामाबरोबरच स्त्रोतांच्या बळकटीकरणाच्या दृष्टीकोनातून भूजल पुनर्भरणाची कामे हाती घेण्यात यावीत. स्त्रोतांचे खोदकाम झाल्यावरच त्याची क्षमता चाचणी (Yield Test) करून भूजलविकास यंत्रणेचे प्रमाणपत्र प्राप्त करावे व नंतर त्याचे बांधकाम पूर्ण करावे.

क. स्त्रोतांचे खोदकाम झाल्यावरच त्याची क्षमता चाचणी (Yield Test) करून भूजलविकास यंत्रणेचे प्रमाणपत्र प्राप्त करावे व नंतर त्याचे बांधकाम पूर्ण करावे.

**४.३ पंपिंग व्यवस्था, उर्ध्व वाहिनी/गुरूत्व वाहिनी, पाण्याच्या टाक्या, जल शुद्धीकरण केंद्र व वितरण व्यवस्था ही कामे बारचार्टनुसार करण्याबाबत.**

अ. प्रत्येक कामाच्या क्रमाचा बारचार्ट प्रकल्पास तांत्रिक मान्यता देणाऱ्या यंत्रणेकडून मान्य करून घेण्यात यावा. जेथे तांत्रिक मान्यता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून घेतेली असेल तेथे कामाच्या बारचार्टला महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची पूर्व मान्यता घेण्यात यावी.

ब. स्त्रोतांचे काम चालू झाल्यांनतर कामाच्या **बारचार्टनुसार** पंपहाऊस, पंपिंग मशिनरी, उर्ध्व वाहिनी/गुरूत्व वाहिनी, पाण्याच्या टाक्या, जलशुद्धीकरण केंद्र व वितरण व्यवस्था या कामांना सुरूवात करावी. सदर कामे पूर्ण झाल्यावर व विद्युत जोडणी मिळल्यानंतर योजनेतील स्त्रोताद्वारे उपलब्ध होणारे पाणी शहरात अस्तित्वात असलेल्या साठवण टाकी/वितरण व्यवस्थेशी जोडून पाणी पुरवठा सुरू करण्यात यावा.

क. वितरण व्यवस्थेअंतर्गत सर्व घरांना नळ जोडण्या देण्यात याव्यात. तसेच पाणीमीटर बसविण्यात यावेत. हे काम पूर्ण झाल्यावर पाणी पुरवठा सुरू करून एकंदरीत नळ योजनेची चाचणी करावी व प्रत्येक घराच्या पाणीपट्टीची आकारणी करून वसूलीची कार्यवाही सुद्धा सुरू करावी.

**५. प्रकल्पाची देखभाल व दुरूस्ती**

१) यापूर्वी कार्यान्वित असलेल्या योजनांचा देखभाल व दुरूस्ती खर्च विचारात घेऊन पाणीपट्टीची आकारणी करण्यात यावी.

२) भूजलाच्या व्यवस्थापनाकरीता नागरीकांच्या सहभागातून पाण्याचा ताळेबंद तयार करावा. भुजल पुनर्भरणाशी संबंधित आवश्यक उपाययोजना उदा. छतावरील पाऊसपाणी संकलन, इत्यादी उपाययोजना राबविण्यात याव्यात.

३) पाणी पुरवठा योजना पूर्ण झालेनंतर ती यशस्वीरीत्या पूर्ण झालेली आहे, हे पडताळण्यासाठी संबंधित कंत्राटदाराशी करारनामा करताना योजना पूर्ण झाल्यानंतर ठेकेदार किमान १ वर्ष सदर योजना चालवेल याबाबत करारनाम्यात अट नमूद करण्यात यावे.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२१४१४५३०६१४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2017.02.16 15:31:10 +05'30'

**(पां.जो.जाधव)**
**सह सचिव,**
**नगर विकास विभाग**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
२. मा. विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव
३. मा. विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी

८. विभागीय आयुक्त (सर्व)

९. जिल्हाधिकारी (सर्व)

१०.आयुक्त (सर्व महानगरपालिका)

११.मुख्याधिकारी (सर्व नगरपरिषदा/नगरपंचायती)

१२.निवडनस्ती (नवि-३३)

*****